२०१५०८२२१७०५५९३३२७

विसरवाडी लघु पाटबंधारे योजना ता. नवापूर जि. नंदूरबार
या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक लपायो २००६/(४६०/२००६)-खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८/३/२००७

पहावे :- कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र. कासं/प्रशा/२३०४/२००६ दिनांक १९/१०/२००६.

**प्रस्तावना :-**

विसरवाडी लघु पाटबंधारे योजना ता. नवापूर, जि. नंदुरबार या योजनेस महामंडळ निर्णय क्रमांक तापाविमं/का.अ/प्रवि-१/९५/२००० दिनांक ४/९/२००० अन्वये रुपये ७९८.१५ लक्ष रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. दरसुचीच्या दरातील वाढ,गौण खनिजावरील स्वामित्व शुल्क, भूसंपादन, संकल्पचित्र बदल या कारणामुळे योजनेच्या किंमतीत वाढ अपेक्षित असल्याने सन २००५-२००६ च्या दरावर आधारित रुपये ११,२१,७२,३७२/- किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांच्याकडून प्राप्त झाला होता. व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंबंधात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आता या निर्णयाद्वारे विसरवाडी लघु पाटबंधारे योजना ता. नवापूर, जि. नंदुरबार या योजनेस सन २००५-२००६ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रुपये ११,२१,७२,३७२/- (रुपये अकरा कोटी, एकवीस लक्ष, बहात्तर हजार तीनशे बहात्तर फक्त) यापैकी रु. ८,९८,३२,६७७/- कामाप्रित्यर्थ व रु. २,२३,३९,६९५/- अनुषंगिक खर्च) रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये देण्यांत आलेला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५ लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधा-यांवरील भांडवली खर्च-८००-इतर खर्च (१) बांधकामे लघु पाटबंधारे योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व चालू आर्थिक वर्षात तापी पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणा-या तरतूदीतून परस्पर भागविण्यांत यावा.

अपा/२/15
८/०३/०७

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमां
१४/११/२००६ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८/०७ व्यय-१२ दि
प्राप्त झालेल्या सहमतीस निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. च
शासनाचे

प्रतिलिपी :-

महालेखापाल- महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
महालेखापाल- महाराष्ट्र राज्य, (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर,
वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, का-१४६१, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, धुळे
कार्यासने :- अर्थ-१, २ (२ प्रतीत) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
लपा-१ कार्यासन (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
जिल्हाधिकारी, नंदूरबार
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जलसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मु
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

/१४६१
१/२००७

शासन निर्णय क्रमांक लपायो २००६/(४६०/२००६)-खारभूमी (दिनांक २८/३/२००७ चे परिशिष्ट)

## विवरणपत्र

## अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | शीर्ष/ उपशीर्ष | कामाची किंमत (लक्ष रुपये) | |
|---|---|---|---|
| | | मुख्य शीर्ष (रुपये लक्ष) | एकूण (रुपये) |
| १) | ए- प्राथमिक | २०,०००/- | २०,०००/- |
| २) | बी-भूसंपादन | १३,५८,६३९/- | १३,५८,६३९/- |
| ३) | सी-मुख्यकामे | ७३,७९९,४७७/- | ७३,७९९,४७७/- |
| ४) | डी-विमोचक | ८१,००,४०८/- | ८१,००,४०८/- |
| ५) | इ-फॉल | --- | --- |
| ६) | एफ-आर.एच.टी.कामे | --- | --- |
| ७) | जी-पूल | --- | --- |
| ८) | एच-एस्केप | --- | --- |
| ९) | के-इमारती | ५०,०००/- | ५०,०००/- |
| १०) | एल-मातीकाम | --- | --- |
| ११) | एम-वृक्षारोपण | --- | --- |
| १२) | ओ-संकीर्ण | १०,०००/- | १०,०००/- |
| १३) | पी-देखभाल | १०,०००/- | १०,०००/- |
| १४) | आर-दळणवळण | ४,००,०००/- | ४,००,०००/- |
| १५) | वितरीका | --- | --- |
| १६) | स्वामित्व शुल्क | ६०,११,१५३/- | ६०,११,१५३/- |
| १७) | वनजमिन Clearance | ७३,०००/- | ७३,०००/- |
| १८) | कामाप्रित्यर्थ | ८,९८,३२,६७७/- | ८,९८,३२,६७७/- |
| १९) | अधिक अनुषंगिक खर्च २५.२५ टक्के ( भूसंपादन वगळून) | | २,२३,३९,६९५/- |
| | योजनेची एकूण किंमत | | ११,२१,७२,३९२/- |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ५१७ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ४७१७.३४ स.घ.मी. |
| पाणीसाठयाची प्रति स.घ.मी.किंमत (रुपये) | २३७७८ < २३७८५ (आर्थिक मापदंडात बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | २.४६ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |

ती)